संग्राहक व प्रकाशक – अरुण गणेश कुळकर्णी.
प्रकाशन स्थळ – ८, ग्रीनपार्क सोसायटी
मकरपुरा रोड
वडोदरा – ३९० ०१०


मूल्य – अमूल्य
पहील्या प्रती – २०००
प्रकाशन तारीख – १५ डिसेंबर २००९
या संग्रहाच्या प्रती साठी संपर्क करा-
Email- kulkarni@technique-baroda.com
Tel- (0265) 2640909 (office) 2632118 (res.)

**स्मरणार्थ**

नानाकाका ज्यांच्याकडुन आयुष्य म्हणजे ज्ञानार्जन, विद्यार्थीदशा हे शिकलो त्याना.

आबाकाका ज्यांच्या देशभक्ति आणि अद्यात्माच्या सुरस गोष्टीनी भारुन गेलो त्याना.

प्रेमळ आप्पाकाकाना.

साहस आणि आत्मविश्वास रुजवणाऱ्या माझ्या वडीलाना.

समाजसेवेचा निःष्काम कर्मयोग दाखवणाऱ्या भाऊकाकाना.

ज्यांच्या घरी संस्कारक्षम मन तयार झाले त्या भाई उर्फ शंकराव घोलकरना.

भक्तिपूर्ण अर्पण

**स्मरणार्थ**

नानाकाका जिनसे सिखा की जीवन का अर्थ ज्ञानार्जन और विद्यार्थीदशा ही है।

आबाकाका जिनकी देशभक्ति और अध्यात्म की बातोंसे अभिभूत हुआ।

स्नेहिल आप्पाकाका

मुझमें साहस और आत्मविश्वास का सिंचन करनेवाले मेरे पिताजी

मुझे समाजसेवा के निष्काम कर्मयोग का दर्शन करवानेवाले भाऊकाका

जिनके सन्निध्य में संस्कारक्षम मन बना उन भाई घोलकर इनको भक्तिपूर्ण अर्पण

# ऋण निर्देश

श्री. सुरेश चांदोरकर ज्यांच्याकडुन संग्रहासाठी उत्तेजन व मोलाचे सहकार्य मिळाले.
डॉ. मुरली पडबिद्री व श्रिमती सुनंदा भावे यानी हिंदी भाषांतराचे बहुमोल काम सांभाळले.
माझी बहीण कमाताई सबनीस जीने माझे मराठी शुध्दलेखन तपासले.
ते कित्येक स्नेहि ज्यानी आपल्या सुंदर आवाजानी श्लोकांना नटविले.
चि. सौ. अल्पना वर्मा जीने हा उपक्रम स्वतःचाच समजुन मुखपृष्ट बनवले.
व अगोदरच आपल्या सर्वांचा जे आपुलकिने हा संग्रह वापरून त्यातील चुका मला कळविण्याचा प्रयास करणार आहेत.

या सर्वांचा शतषः आभारी आहे.

# मनोगत

“दिवे लागले चला शुभंकरोति म्हणा“ दररोज संध्याकाळी ही हांक आम्हां सर्व मुलाना यायची. सर्वजण हातपाय धुवून देवघराकडे धांव घ्यायचे. मग शुभंकरोति, गीताईचा एक अध्याय, पाढे, परवचा यांचा कोरस सुरू व्हायचा. श्री. भाई घोलकर यांच्याकडे घातलेला प्रघात आजही प्रकर्षाने आठवतो. केंव्हा  केंव्हा इतर मुलांबरोबर चढाओढ चाले तर कित्येक वेळी कंटाळा देखील येई. कारण अर्थ न समजता त्यांची घोकंपट्टी चालायची हे एक तर दुसरे म्हणजे हा दंडक लहानानाच कां. मोठ्याना कां नाही ?

पण नंतर त्याच्या परिणामांचा प्रत्यय येत गेला. हळू हळू मोठे होत गेलो. शिक्षण, व्यवसाय, गृहस्थाश्रम मागे पडत गेले. मुले मग नातवंडे इंग्रजी माध्यमात शिकू लागली. व हां हां म्हणता इंग्रजाळली देखील. कुठे तरी कांहीतरी बोंच लागू लागली. मन संभ्रमात पडू लागले. सद्य परीस्थिती बरोबर की आपले लहानपण बरोबर!

सायं प्रार्थनेतून गीताई, गीता आपल्या धर्माचे थोडेफार ज्ञान देत. पुढे त्याचा थोडा फार अभ्यास आपणहून करावा असेही घडत होते. आता अशा प्रार्थनाच नाहीत. धर्म फक्त कोणत्याही फॉर्मवर लिहीण्यापुरता असावा असे चित्र दिसते. हे संभ्रम स्वस्थ बसू देईनात. हळू हळू सायंप्रार्थना जरुरीची आहे असे वाटू लागले. कर्मकांडावरचा पूर्ण अविश्वास तर गीता, वेदसूत्रे, उपनिषिदातील श्लोक, त्यांचे अर्थ, त्यातून घडणारे मार्गदर्शन व मनावर होणारे

संस्कार ह्या वरची श्रद्धा वाढत गेली. हिंदु हा धर्म आहे हा विचार मनुनंतरच्या वर्ण व्यवस्थेवर आधारीत समजाला लागू पडेल, त्या पूर्वीच्या वैदिक काळाला नाही. वेदांतील विचार सर्व सृष्टी नियमांचे विश्लेषण आहे. त्या विरुद्ध वागल्याने सृष्टीत उलथापालथ होउन नाशाचे कारण होते. हा प्रत्यय आज किती प्रकर्षाने जाणवतो.

म्हणून विचार बळावत गेला.

वाटले आपल्याच मित्र आप्तेष्टांमध्ये असे श्लोक संग्रहीत करून अर्थासहित दिले तर! सर्व कुटुंबियानी एकत्र बसून प्रार्थना म्हणावी, त्याचे दूरगामी परीणाम अनुभवावेत, नुसतेच “गर्वसे कहो हम हिंदु हैं” म्हणण्या पेक्षा थोडेफार त्याच्या जवळ जावे ही इच्छा. त्यामुळे हा श्रद्धा- संस्कार संग्रहीत केला.

प्रत्येकाचे भक्तिस्थान वेगळे वेगळे. कोणी शंकराचे उपासक तर कोणी गणपती, राम, हनुमान, दुर्गा यांचे त्यामुळे मिळतील तेवढ्या प्रार्थना संग्रहीत केल्या. स्वेच्छा व भक्ति प्रमाणे प्रार्थनेचा उपयोग करावा. ईश वंदना मात्र जरुर करावी. निर्विकार, निराकार, निर्विकल्प साधने पर्यंत जाण्याची ही पहिली पायरी आहे.
या संग्रहातून निवडक श्लोक घेऊन आपण आपली अशी एक सायं प्रार्थना तयार करता येईल व ती दररोज सायंकाळी एकत्र म्हणता येईल.

या संग्रहात प्रत्येक श्लोका समोर ● असे एक चिन्ह आहे. एक चिन्ह असलेले श्लोक ५ ते ७ वयोगटासाठी, ● ● दोन चिन्हे असलेले श्लोक ७ ते ९ वयोगटा साठी व ● ● ● चिन्हे असलेले श्लोक सर्वांसाठी आहेत.

मुलानी म्हणायची असेल तर मोठ्यानीही म्हणावी कारण मुले अनुकरणप्रिय असतात. फक्त मुलाना आग्रह किंवा सक्ती केली तर त्याना कंटाळा येईल. मोठ्यांचा सहभाग म्हणुनच आवश्यक आहे.
प्रत्येक श्लोकाचा अर्थ इंग्रजी, हिंदी व मराठी मध्ये दिला आहे. उच्चारण व्यवस्थित व सुंदर यावे यासाठी Audio Visual CD दिली आहे जी कॉंपुटरवर किंवा टीव्हीवर चालू शकते.

स्वानुभव सांगतो की याचे खरोखर सुंदर परीणाम आपल्यावर होतात. कदाचित् आपणही

**अहं निर्विकल्पो निराकाररूपो। विभुर्व्याप्त सर्वत्र सर्वेंद्रियाणाम्।**
**सदा मे समत्वं न मुक्तिर्न बन्धः। चिदानन्दरूपः शिवोऽहम् शिवोऽहम्।।**

या अवस्थेचा अनुभव घेऊ शकता म्हणुन हा श्रद्धा-संग्रह केला आहे. गोड मानून घ्यावा
आपला
अरुण गणेश कुळकर्णी
दिगवळेकर.

# गणपती वंदना

गणपती विघ्नहर्ता म्हणून त्याला पहिले वंदन असा मोठा समज आहे. गणपती लेखनांत अतिशय जलद, महर्षि व्यास महाभारत बोलत गेले आणि गणपती लिहीत गेले. एकवेळ तर गणपतीनी व्यासां बरोबर चढाओढ लावली. ही सुद्धा आख्यायिका आहे.

पण जसे एखाद्या संत साधुचे आख्यान किर्तन झाल्यावर केलेला नमस्कार व्यासांसाठी असतो, व्याख्यानाच्या मंचाला व्यासपीठ म्हणतात. तसेच कोणतेही कार्य हे महानच असल्यामुळे किंवा त्या कामाला महानता व गती प्राप्त व्हावी म्हणून गणपतीला स्मरण, वंदन करून पाचारण करण्याचा प्रघात आहे.

*गणपति विघ्नहर्ता हैं इसीलिये कार्यारंभमे सबसे पहलावंदन उन्हें ही करने की प्रथा हैं। गणपति की लिखनेकी गती अत्यन्त तेज थी। महर्षि व्यास बोलते गए और गणपति साथ साथ लिखते गए। ऐसी भी आख्यायिका है कि एक बार तो गणपति महर्षि व्यास के साथ स्पर्धा पर उतर आए थे।*

*जहां से कथा का व्याख्यान बोला जाता है उस मंच को व्यासपीठ कहा जाता है और कथा, आख्यान की समाप्ति पर उसके वाचक साधु संत को किया गया नमस्कार महर्षि व्यास को पहुँचता है। किसी भी कार्य को* महानता और गति प्रदान *करने के लिए गणपति का स्मरण करने और उन्हे वंदन करके उनका आहवान करने की प्रथा रही है.*

**वक्रतुण्ड महाकाय सूर्यकोटी सम प्रभः ।**
**निर्विघ्नं कुरुमेदेव सर्वकार्येषु सर्वदा ।।**

O elephant headed and large bodied Lord, radiant as a thousand Suns, I ask for your grace so that this task that I am starting may complete without any hindrances.

हत्ती सारख्या तोंडाच्या, विश्वव्यापी शरीर व हजारो सुर्यांचे तेज असलेल्या हे गणपति माझी सर्व कार्ये विघ्नरहित कर.

*हाथी जैसा मुख, विश्वव्यापी शरीर और हजारों सूर्य समान तेजवाला देव (गणपति) मेरे सभी शुभ कार्यों को विघ्नरहित करे।*

**शुक्लाम्बरदरं विष्णुं शशिवर्णं चतुर्भुजम् ।**
**प्रसन्नवदनं ध्यायेत् सर्व विघ्नोपशान्तये ।।**

Lord Ganesh, who wears a white garment, who is all-pervading, who has a bright complexion, who has four arms, who has an ever smiling face, upon that God, I meditate for removal of all obstacles

शुभ्र वस्त्र ल्यालेल्या, सर्व चरारात समावलेल्या, तेजस्वि कांतिच्या, चार बाहूवाल्या प्रसन्नवदन गणरायाचे, सर्व संकटांचा नाशव्हावा म्हणून ध्यान करीत आहे.

*शुभ्र वस्त्र परिधान किये, सभीजगह पाये जानेवाले, चमकती कांतिवाले, चार भुजावाले प्रसन्नवदन गणपति देवताका सर्व विघ्न नाश करनेकेलिये मैं ध्यान करता हूं।*

# गुरुवंदना

गुरुचे स्थान वैदिक काळातच संस्थापित झालेले आहे. गुरु शिवाय देवाची प्राप्ति होऊ शकत नाही असे आजही आपण ऐकतो. गुरुची तुलना देवा बरोबर केली आहे. गुरु ही व्यक्ति नसून ज्ञान देत जाणारी प्रक्रिया आहे. पहिला गुरु म्हणजे आई. माया, चालणे, बोलणे, गोष्टी, गाणे केवढे काय काय शिकवते ते ज्ञान मिळवले तरच पुढचा आयुष्य प्रवास. दुसरे गुरु वडील जे बालबोधातून खेळणे, सहन करणे, धैर्य, असे पुरुषार्थी ज्ञान देतात. पूर्वी गुरुगृही ज्ञान जसे पाठांतर, लिहीणे, वाचणे वगैरे साठी जात. आता शाळेत जातो. पुस्तके, ग्रंथ, निसर्ग, पर्वत, नद्या, वृक्ष, वेली जे जे आपणास कांही ना कांही शिकवत जातात, अनुभव सिद्ध करतात ते सर्व गुरुस्थानी असतात. ज्ञानी होणे म्हणजेच ईश्वर प्राप्ति ती गुरु मुळेच मिळते ना ? गुरुला उपवासी म्हटले आहे. याचा अर्थ जो देवाच्या उपवासात (शेजारी) आहे. आणि म्हणुनच ज्ञानप्राप्ति व ईश्वर प्राप्ति साठी गुरु स्मरण, वंदन हे कृतज्ञतेचे द्योतक आहे.

*वैदिक काल से गुरु को सर्वोच्च स्थान दिया है। गुरु के बिना तो भगवान की भी प्राप्ति नही हो सकती। गुरु कोई व्यक्ति नही बल्कि ज्ञान प्राप्त करने की प्रक्रिया है। पहला गुरु तो माँ होती है। वही उसे चलना, बोलना, गाना, स्नेह, प्रेम आदि की शिक्षा देती है। पिता उसे खेलना, सहना, धीरज, पुरुषार्थ आदि सिखाते है। लिखना, पढना जैसी अध्ययन प्रधान बातें सीखने शिष्य पूर्वकालमें गुरुगृह जाते थे, आजकल स्कूल में जाते है। इसके अलावा भी हम पुस्तको, ग्रंथो, अनुभवो और प्रकृति से भी सिखते है। इन सभी का स्थान गुरु समान ही है। ज्ञान प्राप्ति ईश्वर प्राप्ति का मार्ग है और ज्ञानप्राप्ति गुरु के बिना सम्भव नही। गुरु उपवासी अर्थात ईश्वर के निकट रहनेवाले है इसीलिए ज्ञान प्राप्ति और ईश्वर प्राप्ति के लिये गुरुस्मरण करना प्रसंगोपात एवं कृतज्ञता दर्शक भी है।*

**गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुः गुरुर्देवो महेश्वरः ।**
**गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्री गुरवे नमः ।।**

I prostrate to that Shri Guru, Who is himself Bramha, Vishnu and God maheshwara and who is verily the Supreme Absolute itself

गुरु हेच ब्रम्हा, विष्णु आणि महेश होत, साक्षात परब्रम्ह अशा या गुरुसमोर मी नतमस्तक होत आहे.

*गुरुही ब्रम्हा, विष्णु और शंकर हैं, साक्षात परब्रह्म ऐसे गुरुको मैं नमन करता हूं।*

**त्वमेव माता च पिता त्वमेव**
**त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव ।**
**त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव**
**त्वमेव सर्वं मम देव देव ।।**

O Lord ! You are my mother and my father also; You are my brother and friend; You are knowledge and wealth; You are everything to me; O! God of all Gods

हे देवा आपणच माझे माय, बाप, भाऊ, मित्र आहात. माझे ज्ञान व संपत्ति आपणच आहात. आपण माझे सर्वस्व आहात.

*हे भगवान आपही मेरे माता और पिता हो। आपही मेरे बंधु और मित्र हो। आपही मेरे विद्या और संपत्ति हो। आपही मेरेलिये सबकुछ हो।*

# दैनंदिनी

वेदिक श्लोकांतून कृतज्ञता प्रकर्षाने जाणवते. आपण जे जे उपभोगतो, वापरतो, मग ते निसर्गदत्त असले तरी त्याचे ऋणी रहावे. आणि म्हणूनच प्रातःकाली देवाचे नांव, धरतीचे ऋण मानून दिवस सुरु करावा ही वेद कालीन प्रथा. शिस्तप्रिय, विनयशील व्यक्तित्व यातून तयार होते.

*वैदिक श्लोकोमें कृतज्ञता का भाव मुख्य रूप से देखने को मिलता है। हम जिस किसी भी निसर्गदत्त वस्तु का उपयोग, उपभोग करते है उसके प्रति हमें कृतज्ञ होना चाहिए। सुबह उठकर सबसे पहले भगवान और धरती का ऋण मानकर ही दिन के कामका आरम्भ किया जाए यह वेदकालीन प्रथा है। इससे व्यक्तिमें विनम्रता और अनुशासन का विकास होता है।*

# प्रातः स्मरण

**कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती ।**
**करमूले तु गोविन्दः प्रभाते करदर्शनम् ।।**

My finger tips are ascribed to Laxmi, The middle of the hands to Saraswati, and the root to Govinda. Therefore I look at my hands every morning to do the honest work.

प्रभाती दोन्ही हातांकडे पहात, हातांच्या अग्रभागी लक्ष्मी, मध्यभागी सरस्वती व मूळभागी श्रीकृष्ण असे प्रतिक मानून देव स्मरण करावे. (**पहीलेच मंगल स्मरण**)

*प्रातःकालमे अपने हाथोंको देखिये । हाथोंके अग्रभाग लक्ष्मीका प्रतीक है। मध्यभाग सरस्वती का प्रतीक है। और निःशेष भाग कृष्ण का प्रतीक है.*

**समुद्रवसने देवी, पर्वतस्तनमण्डले ।**
**विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ।।**

O! mother earth, Who has the ocean as clothes and mountain and forest as her body, Who is wife of Lord Vishnu, I bow to you. Please forgive me for touching you with my feet.

समुद्राचे वस्त्र ल्यालेली, पर्वत व वनराजी जिचे शरीर आहे अशा विष्णुपत्नी पृथ्वीमाते माझ्या पायांच्या स्पर्शा बद्दल मला क्षमा कर.

*समुद्र जिसका वस्त्र है, पर्वत और वन जिसका शरीर है, जो विष्णुकी पत्नि है, हे पृथ्वी देवी मेरे पैर स्पर्शकेलिये क्षमाकरें।*

(**सकाळी उठल्यावर जमीनीवर,मायभूमीवर पाय ठेवावेच लागतात म्हणून तिची क्षमा मागणे हे हृद्य आहे.**)

**ब्रह्मा मुरारिस्त्रिपुरान्तकारी भानुः शशी भूमिसुतोबुधश्च।**
**गुरुश्च शुक्रः शनिराहुकेतवः कुर्वन्तु सर्वे मम सुप्रभातम् ।।**

Brahma, Vishnu, Shiva and the nine Grahas Sun, Moon,Mangal, Budha, Bruhaspati, Shukra, Shani, Rahu, Ketu, may all these make my morning auspicious.

मी माझी प्रभात मंगलमय करण्यासाठी, हे ब्रह्मा, विष्णु, महेश और नवग्रह सूर्य, चंद्र, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहू, केतू, आपणांस मी विनंति करीत आहे.

(**सर्व ग्रहांचे कृतज्ञतापूर्वक स्मरण**)

*हे ब्रह्मा, विष्णु, महेश और नवग्रह सूरज, चंद्र, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहू, केतू आप मेरी प्रभात सुमंगल बनाएं।*

सकाळी ऊठोनी देवासी भजावे
गुरुसी वंदावे जीवे भावे.
वडिलांची आज्ञा घेतल्या वाचूनि
कोठे घरातून जाऊ नये.
खोटे कधी बोलू नये
चोरी कधी करु नये
कोणासंगे भांडू नये
गोड फार खाऊ नये
पाहीले ते मागू नये.
हे चित्ति जो धरी बोल
त्याचे कल्याण होईल.

# सूर्य नमस्कार -आराधना

सर्व सृष्टी सुर्योदयाने जागृत होउन कार्यरत होते. पहाटे पासून सुर्योदया पर्यंतच्या काळाला अमृतवेळा म्हटले आहे. सूर्य जीवनावश्यक शक्तिदायी आहे. आपले जीवन शक्तिशाली व सतेज राखण्या करीता. हा व्यायाम व आराधना अत्यंत उपयोगी आहे.

*सम्पूर्ण सृष्टि सूर्योदय से जागृत होकर कार्यरत होती है। प्रातःकाल से सूर्योदय तक के समय को अमृतकाल कहा जाता है। सूर्य जीवनदाता है। अपने जीवन को निरोगी और शक्तिशाली बनाने के लिये प्रातःकालीन व्यायाम और सूर्याराधन अत्यन्त उपयोगी है।*

१ ॐ मित्राय नमः २ ॐ रवये नमः
३ ॐ सूर्याय नमः ४ ॐ भानवे नमः
५ ॐ खगाय नमः ६ ॐ पूष्णे नमः
७ ॐ हिरण्यगर्भाय नमः ८ ॐ मरीचये नमः
९ ॐ आदित्याय नमः १० ॐ सवित्रेय नमः
११ ॐ अर्काय नमः १२ ॐ भास्कराय नमः

Surya Namaskar consists of twelve yogasanas. After learning the action perfectly it should be done regularly at least twelve times or in multiples of it. It keeps you fit throughout your life. Recite the one name at every action to worship Sun God.

सूर्य नमस्कार हा बारा योगासने घडवतो. नमस्कार क्रिया शिकून नियमित केल्याने स्वाथ्य उत्तम राहाते. प्रत्तेक नमस्काराच्या वेळी एक नांवाचे उच्चारण करीत सूर्य आराधना करावी.

*सूर्य नमस्कार क्रिया अच्छी तरहसे सीखें. हररोज बारह या अधिक बार नमस्कार करनेसे मनुष्य स्वस्थ रहता है। हर क्रिया के समय एक एक सूर्य नाम लेके आराधना करें।*

# संध्यादीप

**शुभं करोति कल्याणं आरोग्यं धनसम्पदः।**
**शत्रुबुद्धि विनाशाय दीपज्योतिर्नमोऽस्तुते ।।**

I bow to the evening Lamp lit before god in my home every day. The lamp which brings auspiciousness, prosperity, good health, abundance of wealth and destruction of evil thoughts.

हे सांजवाती तू जसा अंधार दूर करतेस व प्रकाश पसरवतेस तसे माझ्या मनातील वाईट विचारांचा नाश करून मला आरोग्य, धनसंपत्ति दे. माझे शुभ कर, कल्याण कर. मी तुला मनोभावे नमस्कार करीत आहे.
(**दीप स्मरण व शुभचिंतन**)

*हे संध्या दीपज्योति आप जैसे अंधःकार दूर करके प्रकाश फैलाती हैं उसीतरह मेरे मनसे गलत विचारोंका नाश करके मुझे स्वस्थ आरोग्य, धनसंपत्ति दें, शुभ करें, कल्याण करें. मै आपको मनसे शरण हूँ।*

सदा सर्वदा योग तुझा घडावा
तुझे कारणी देह माझा पडावा
उपेक्षु नको गुणवंता अनंता
रघुनायका मागणे हे चि आता
जय जय रघुवीर समर्थ.

दिव्या दिव्या दीपोत्कार
कानीं कुंडले मोती हार
दिव्याला पाहून नमस्कार
दिवा लावला तुळशीपाशी
उजेड पडतो विष्णु पाशी
माझा नमस्कार सर्व देवांसाठी.

## विद्याभ्यासारंभः-

**सरस्वति नमस्तुभ्यं वरदे कामरूपिणी ।**
**विद्यारम्भं करिष्यामि सिद्धिर्भवतु मे सदा ।।**

O Goddess Saraswati, salutations to you, the giver of boons, the one who fulfills all desires. I begin my studies. May there always be accomplishments for me.

ज्ञान व मनोकामना पूर्ण करण्याचे वरदान देणारी सरस्वतीदेवी मी तुला नतमस्तक होऊन विद्याभ्यास सुरू करत आहे. मला माझ्या ज्ञानार्जनात परीपूर्णता दे.
(**विद्या देवीचे कृतज्ञता पूर्वक आवाहन**)

*ज्ञानका वरदान देनेवाली और मनोकामना पूर्ण करनेवाली सरस्वतीदेवी मैं आपको नमस्कार करके विद्याभ्यास शुरु करता हूँ। मुझे पूर्ण यश दे।*

## स्नानप्रहर:-

**गङ्गे च यमुने चैव गोदावरी सरस्वती ।**
**नर्मदे सिन्धु कावेरी जलेऽस्मिन् सन्निधिं कुरु ॥**

In this water, I invoke the presence of holy waters from the rivers Ganga, Yamuna, Godavari, Saraswati, Narmada, Sindhu and Kaveri.

मी या स्नाना साठी घेतलेल्या पाण्याला शुद्ध करण्या करीता गंगा, यमुना, सरस्वती, नर्मदा, सिंधु, कावेरी या सर्व सरिताना पाचारण करतो.

**(शरीर पवित्र, स्वच्छ करते वेळी सर्व पवित्र नद्यांचे स्मरण –आदरार्थी)**

*मैं इस स्नानार्थ लिये हुये जलको पवित्र करनेके लिये गंगा, यमुना, सरस्वती, नर्मदा, सिंधु, कावेरी नदीयोंको आदरपुर्वक बुलाता हूँ।*

## निद्रापूर्वः- ●●●

**करचरणकृतं वाक्-कायजं कर्मजं वा ।**
**श्रवणनयनजं वा मानसं वाऽपराधम् ।**
**विहितमविहितं वा सर्वमेतत् क्षमस्व ।**
**जय जय करुणाब्धे श्रीमहादेव शम्भो ।।**

Oh Lord kindly forgive my wrong actions done knowingly or unknowingly, either through my organs of action (hand, feet, speech) or through my organs of perception (eyes, ears) or by my mind. Glory unto Thee O Lord, who is the ocean of kindness.

आज माझ्या हात, पाय, कान, डोळे किंवा मन यामुळे कोणतेही दुःष्कृत्य घडले असेल तर हे करुणासागर शिवशंकरा मला क्षमा कर.

(**देवापुढे पूर्ण शरणागती**)

*आज मेरे हाथ, पैर, वाचा, कान, आँख या मनसे कोई अपराध हुए हों तो, हे क्षमासागर महादेव शंभो मुझे क्षमा करो।*

## भोजन मंत्रः-

**ॐ सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सहवीर्यम् करवावहै ।**

**तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ।**

**ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।**

Om, May Lord protect us, May He cause us to enjoy, May we exert together, May our studies be thorough and faithful, May we never quarrel with each other. Om Peace Peace Peace.

हे देवा आम्हीसर्व एकजुटीने राहावे, एकत्र जेवावे, एकजुटीने शौर्यवान व्हावे, तेजस्वि व विचारवंत व्हावे, (मनात) द्वेष भावना नाहीशी व्हावी ही प्रार्थना. सर्वत्र शांतिच शांति होईल.

**मराठी प्रार्थना**

**वदनि कवळ घेता नाम घ्या श्रीहरीचे। सहज हवन होते नाम घेता फुकाचे।**

**जीवन करी जिवित्वा अन्न हे पूर्ण ब्रह्म। उदर भरण नोहे जाणिजे यज्ञ कर्म।**

**जय जय रघुवीर समर्थ।**

**(मैत्री, सहकार, एकात्म भावना रुजविण्यासाठी तंटा रहीत कौटुंबिक स्वास्थ्या साठी)**

*हे भगवान हम सब एकसाथ रहें, एकसाथ भोजन करें, शौर्य-वीरता एकसाथ दिखायें, तेजस्वि और विचारवंत बनें, आपसमे द्वेष न करें यही प्रार्थना. सभी शांति होगी.*

**कर्पूरगौरं करुणावतारं संसारसारं भुजगेन्द्रहारम् ।**
**सदा वसन्तं हृदयारविन्दे भवं भवानीसहितं नमामि ।।**

He who is fair like camphor, who is ever compassionate, by whose being the entire universe exists, around whose neck there is a garland of serpents, may he always live in my heart along with Bhavani, his consort. I bow down to him.

ज्याचा कपूरा सारखा गोरा वर्ण, जो दया-क्षमा यांचा अवतार, जो सृष्टीचा विधाता, जो माझ्या हृदयात वसंत बहरवित आहे अशा शीवशंकराला भवानि माते सहित नमस्कार करतो.

*जो कपूर जैसे गौर वर्णका है, जो करुणाका अवतार है, जो इस सृष्टीका सभीकुछ है, जिसके गलेमें नागोंका हार है, ऐसे शिव जो मेरे हृदय में बसे हैं, उन्हें और भवानी माताको मैं नमन करता हूँ।*

**ॐ त्र्यंबकं यजामहे सुगन्धिम् पुष्टिवर्धनम्**
**उर्वारुकमिव बंधनन् मृत्योर्मुक्षीय मामृतात् ।**

I worship the fragrant three-eyed one who nourishes all beings; grant me liberation in the same manner as a ripe cucumber naturally severs itself from the vine.

जसे वेलीचे खरबूज पिकून सुगंधित होते व (एक दिवशी) वेलीच्या देठा पासून अलगद वेगळे होते तसेच माझे जीवन (दुःख विरहित) पूर्ण व्हावे व आत्म्याला मोक्षाचा अमृत अनुभव मिळावा म्हणून हे त्रिनेत्रि शंकरा मी तुझी आराधना करीत आहे.

*मैं त्रीनेत्रवाले भगवान शंकरजी का ध्यान करता हूँ। जैसे बेलका फल पूर्ण परीपक्व होकर अपनी सुगंध फैलाता है और (एकदिन) बेलसे अलग होता है वैसेही मुझे इस जीवनसे (यातनारहित) मुक्त करें और मोक्षके अमृतका अनुभव दें।*

**या कुन्देन्दु तुषारहार धवला या शुभ्रवस्त्रावृता ।**
**या वीणावरदण्डमण्डितकरः या श्वेतपद्मासना ।।**
**या ब्रह्माऽच्युतशंकरप्रभुतिभिर्देवैः सदा वन्दिता ।**
**सा मां पातु सरस्वती भगवती निःशेषजाड्या पहा ।।**

Fair as a jasmine flower, the moon or a flake of snow, dressed in white, Her hands adorned by the graceful veena staff, seated on a white lotus, Adored by Brahma, Vishnu, Shiva, and the other deities,Protect me, Oh Goddess Saraswati, remover of ignorance inert.

जिचे चंद्रासारखे तेज व तसाचवर्ण आहे, शुभ्र वस्त्र नेसून, हातात वीणा घेउन जी शुभ्र कमळावर बसली आहे, जिला ब्रह्मा, विष्णु, व सर्व देव आदराने वंदन करतात, त्या अज्ञानचा अंधःकार दूर करणाऱ्या
सरस्वती देवी माझे रक्षण कर.

*जो चंद्रमाके प्रकाश जैसी गौर वर्णकी, जिसने शुभ्र वस्त्र धारण किया, जिसके हाथोंमे वीणा है, जो शुभ्र कमलपर बैठी, जो ब्रह्मा, विष्णु, और अन्य देवताओंसे वंदित, वह अज्ञानकी जडता नाश करनेवाली सरस्वती देवी मेरी रक्षा करे।*

**सर्व मंगल मांगल्ये शिवे सर्वार्थ साधिके ।**
**शरण्ये त्र्यम्बके गौरी नारायणी नमोऽस्तुते ।।**

Adorations to Goddess who is the auspiciousness of all that is auspicious, who is the consort of Lord Shiva, who is the bestower of every desire of one's heart. Adorations to You O Devi, I have taken refuge in you.

सर्वांचे कल्याण व मंगल करणाऱ्या, सर्वेच्छा पुरी करणाऱ्या हे शिवपत्नि गौरी-नारायणी मी तुला शरण येत आहे, माझा नमस्कार मानून घे.

*सभीप्रकारसे मंगलमय और कल्याणकारी, सभी ईच्छाओंको पूरा करनेवाली शिव पत्नी गौरी-नारायणी को मैं शरण हूँ। नमस्कार करता हूँ।*

**या देवी सर्व भूतेषु शक्तिरूपेणु संस्थिता ।**
**नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः ।।**

O! mother, Who is present everywhere, who is embodiment of power and energy, I bow to you, I bow to you, I bow to you.

जी देवी शक्ति रुपात सर्व प्राणिमात्रात भरलेली आहे, त्या देवीला शतशः नमस्कार.

*जो देवी शक्तिके रूपमे सभी प्राणियोंमे बसी है, उस देवीको मेरा बार बार नमस्कार।*

**शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशं ।**
**विश्वाधारं गगन सदृशं मेघवर्णं शुभांग्ङम् ।**
**लक्ष्मीकान्तं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यम् ।**
**वन्दे विष्णुं भवभयहरं सर्वलोकैकनाथम् ।।**

I adore Lord Vishnu who is the embodiment of peace, who lies on the Shesha serpent, whose navel is the source of the Lotus, whose complexion is swarthy like the clouds, whose body shines with heavenly beauty, who is the beloved of Goddess Lakshmi, whose eyes are like lotus, who is meditated upon by the yogis, who is the remover of the fear of the world-process.

हे शांतिस्वरुप, शेषनागावर पहुडलेला, नाभीमध्यें कमळ उगवलेला, सृष्टीचा भार सांवरणारा जो आकाशा प्रमाणेच विशाल, सावळ्या कांतिचा, योगी ज्याचे नित्य स्मरण करतात, या भवसागरातले भय घालवणारा, सर्व त्रिलोकाचा अधिपति – लक्ष्मीपति विष्णु तुला प्रणिपात.

*जो शांतिका स्वरुप है, जो शेष नागपर लेटा है, जिसकी नाभीसे कमल निकला है, जिसने सृष्टिका भार संभाला है, जो आकाशके समान विशाल है, जिसका वर्ण बादलों जैसा (सांवला) है, लक्ष्मीपति जिसके नेत्र कमल जैसे हैं, योगी जिसका ध्यान करते हैं, जो विश्वसे भय हटाता है, जो सर्व लोकका स्वामी है उसे मै वंदन करता हूँ।*

**कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा बुध्दयात्मना वा प्रकृते स्वभावात् ।**
**करोमि यद्यत् सकलं परस्मै नारायणायेति समर्पयामि ।।**

I dedicate everything to that supreme Lord Narayana; whatever I perform with my body, speech, mind, limbs, intellect or my inner self either intentionally or unintentionally.

मी शरीर, मन, वाणी, बुद्धिने जाणता, अजाणता केलेली माझी सर्व कर्मे नारायणाला अर्पण करतो.

*मैं तन, मन, वाणी, बुद्धि से, जाने, अनजानेमें किये सभी कर्म नारायणको समर्पित करता हूँ।*

**वसुदेवसुतं देवं, कंसचाणूरमर्दनम् ।**
**देवकीपरमानन्दं, कृष्णं वन्दे जगद्-गुरुम् ।।**

I bow to you O Krishna, the Supreme Guru, Son of Devaki and Vasudeva, the remover of Kamsa and Chanur.

वसुदेवाचा पुत्र, कंस व चाणूराचा वध करणारा, देवकीचा श्रेष्ठ आनंद अशा जगद्गुरु कृष्णाला नमस्कार.

*वसुदेवके पुत्र, कंस और चाणूरका वध करनेवाले, देवकी के श्रेष्ठ आनंद, जगद् गुरु कृष्ण को वंदन।*

**आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।**
**सर्वदेव नमस्कारं केशवं प्रतिगच्छति ।।**

Just as every rain drop that falls from the sky flows into the Oean, in the same way every prayer offered to any Deity flows to Lord Krishna.

जसे पावसाचे पाणी शेवटी समुद्राला मिळते, त्याच प्रमाणे कोणत्याही देवाची केलेली प्रार्थना शेवटी श्रीकृष्णालाच पोहोचते.

*जैसे आकाशसे बरसता (बारीशका) पानी अंतमें समुद्रको मिलता है, वैसेही किसीभी देवताकी की गयी प्रार्थना श्रीकृष्णको ही जाती है।*

**रामाय रामभद्राय रामचन्द्राय वेदसे ।**
**रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः ।।**

My salutations to Lord Sri Ram, the protector of all, one who knows all, the descendent of the Raghu dynasty. the husband of Sita and the Lord of the entire universe.

सर्वज्ञानी, सर्वांचा रक्षणकर्ता, रघुकुलाचा सुपुत्र, सीतेचा पति, अशा रामाला नमस्कार करतो.

*सबके रक्षक, सब जाननेवाले (सर्वज्ञानि) रामको, रघुकुलके नाथको, सीता के पति को मेरा नमस्कार।*

**श्री रामचन्द्रचरणौ मनसा स्मरामि ।**
**श्री रामचन्द्रचरणौ वचसा गृणामि ।**
**श्री रामचन्द्रचरणौ शिरसा नमामि ।**
**श्री रामचन्द्रचरणौ शरणंप्रपद्ये ।।**

I worship the feet of Sri Ramchandra ji in my mind, I worship his feet with my speech, I bow my head to his feet with great reverence, I surrender myself to his presence.

मी श्रीरामाची मनात स्मरून पूजा करतो. मी श्रीरामाला वाचेतून पुजतो. मी श्रीरामाच्या पावलांवर डोके ठेवून पूजा करतो. मी श्रीरामाला पूर्ण शरणागत आहे.

*मैं श्रीरामजीके चरणकी मनमें पूजा करता हूँ। मैं श्रीरामजीके चरणकी वाणीसे पूजा करता हूँ। मैं श्रीरामजीके चरणमें सीर झुकाकर पूजा करता हूँ। मैं रामजीके चरणमें शरण लेता हूँ।*

**मनोजवं मारुततुल्यवेगं जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम् ।**
**वातात्मजं वानरयूथमुख्यं श्रीरामदूतं शरणंप्रपद्ये ।।**

I salute Hanumaan, who travels as fast as the mind and the wind, who has mastered his sense organs, who is the best among the intelligent, who is the son of the wind God, who is the commander-in-chief of the army of vaanaras, and who is the messenger of Sri Ram.

ज्याचा वेग मन आणि वाऱ्या सारखा आहे, ज्याने आपली इंद्रिये वश केली आहेत, जो श्रेष्ठ बुद्धिवान आहे, वायुपुत्र, वानर सेनेचा प्रमुख, रामाचा दूत, अशा श्री हनुमानला मी शिरसाष्टांग नमस्कार करतो.

*जिसकी गति मन और वायु जैसी तेज है, जिसने अपनी इंद्रियोंको वशमें रखाहै, जो बुद्धिसे महान है, पवन पुत्र, वानर सेनाके प्रमुख, श्रीरामके दूत, हनुमानको मैं सिरसे नमस्कार करता हूं।*

**ईषावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्याम् जगत् ।**
**तेन त्यक्तेन भूञ्जीथाः मा गृधः कस्यस्विद् धनम् ।।**

All this whatsoever moves in this universe including the universe, itself moving, is indwelt or pervaded or enveloped or clothed by the Lord. That renounced, thou shouldst enjoy. Covet not any body’s wealth

हे विश्वात जे कांही चालते आहे, फिरते आहे, छोट्या अथवा मोठ्या घटना, स्वतः विश्वचक्र, हे ईश्वराने आच्छादलेले आहे, ईश्वराने ल्यालेले आहे, विश्वात (छोट्या कणातसुद्धा) ईश्वर आहे. (या चक्रात) जे त्यागतोस त्याचा आनंद मान. कोणाच्याही संपत्तिची हांव करु नकोस.

*इस विश्व में छोटेसे बडे तक जो कुछ हो रहा है, चल रहा है, यह पूर्ण विश्व चलायमान है, वह ईश्वरद्वारा आच्छादित है। विश्वही ईश्वरने पहना है। उसीमें ईश्वर है। (इसलिये) त्यागते हो उसका आनन्द मानो। किसीकी संपत्तिकी ईर्षा मत करो।*

**यं ब्रह्मा वरुणेन्द्र रुद्र मरुतः स्तुवन्ति दिव्यै स्तवैः ।**
**वेदैः साङ्गपदक्रमोपनिषदै गायन्ति यं सामगाः ।**
**ध्यानावस्थित तग्दतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो ।**
**यस्यान्तं न विदुः सुरः सुरगणाः देवाय तस्मै नमः ।।**

Salutations to that God whom Brahma, Varuna, Indra, Rudra, and Marut praise with divine hymns, whom the singers of Sama Veda invoke by the Vedas And the related branch of Knowledge ,the Upanishads, whom the Yogis see with their minds focused on Him in meditation, whose limit the Devas and Asuras do not know.

ब्रह्मा, विष्णु, ईन्द्र, रुद्र आणि वायु ज्याची स्तुति करतात, सामवेदी आणि उपनिषद गायक ज्याचे गुणगान करतात, ज्याला योगी ध्यानावस्थेत पहातात, ज्याची सीमा सुर आणि असुराना गवसली नाही त्या श्रेष्ठ देवाला मी नमस्कार करतो,

*जिसकी ब्रह्मा, विष्णु, ईन्द्र, रुद्र, और वायु स्तुति करते हैं, जिसका सामवेदी और उपनिषद् गायक गायन करते हैं, जिसको योगी ध्यानावस्थामें देखते हैं, जिसकी सीमा सुर और असुर नहीं जानते, उस देवता को मेरा नमस्कार।*

**मूकं करोति वाचालं पंङ्गुमलंघयते गिरिम् ।**
**यत्कृपा तमहं वन्दे परमानन्द माधवम् ।।**

By your blessings, a mute becomes talkative and a lame climbs a mountain. O Eternally Blissful Madhava, I offer my salutations

ज्याच्या कृपेने मुका बोलू लागतो, अपंग लंगडा पर्वत पार करु शकतो, अशा परम् आनंददायी माधवाला माझा नमस्कार.

(**या प्रार्थना आपल्या भक्ति स्थानाप्रमाणे वापरव्यात. व्यक्तित्व विचारवंत व चिंतनशील होते. ईश वंदना ही जरुर करावी ती वैदिक कालची आहे निसर्गाला महत्व देणारी आहे.**)

*जिसकी कृपासे मूक बातें करने लगता है, अपंग पर्वत पार कर सकता है, ऐसे परम् आनंददायी माधवको मैं वंदन करता हूं।*

# मंत्र

या नंतरच्या मंत्रांच्या अर्थावरून समजतेच- प्रसन्न व्यक्तित्व, कृतज्ञता, भक्ति, आदर, सहजीवन, ज्ञानलालसा असे विविध गुण मंत्रांमुळे आत्मसात करता येतात. शांत व प्रसन्न जीवन व आरोग्यासाठी फार उपयोगी आहेत.

## गायत्रि मंत्र

**ॐ भूर्भुवः स्वः तत्सवितुर्वरेण्यं।**

**भर्गोदेवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात् ।।**

Let us meditate upon the glory of Ishwar, who has created this universe, who is fit to be worshipped, who is the remover of all sins and ignorance. May He enlighten our intellect.

या तेजोमय ईश्वराची आपण भक्ति करुया, ज्याने ही सुंदर विश्वसृष्टि निर्मिली आहे, जो ध्यान करण्या सारखा आहे. तो आमच्या बुद्धिला प्रेरणा देवो.

*हम इस तेजस्वी ईश्वरका ध्यान करते हैं, जिसने इस विश्वसृष्टि का निर्माण किया है।(इसलिये) ध्यान करने योग्य है। वह हमारे बुद्धिको प्रेरणा दे।*

## शांती मंत्र

**ॐ सर्वेषां स्वस्तिर्भवतु। सर्वेषां शान्तिर्भवतु ।**
**सर्वेषां पूर्णं भवतु। सर्वेषां मंगलं भवतु ।**
**ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।**

May all be auspicious, may all attain peace, let there be fullness and contentment all over, may all be blessed. Om peace, peace, peace.

सर्व प्राणी आनंदी होवोत. सर्वांना शांति लाभो. सर्वांच्या इच्छा पूर्ण होवोत. (परिणामे) सर्वत्र परम् शांति होवो.

*सभी प्राणीमात्र स्वस्थ बनें। सभीको शांति मिले। सबकी ईच्छायें पूरी हों। सभीका कल्याण हो। सर्वत्र शांतिहि शांति हो।*

**ॐ सर्वे भवन्तु सुखिनः। सर्वे सन्तु निरामयाः ।**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु। मा कश्चित् दुखभाग्भवेत ।**
**ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।**

May everybody be happy. May everybody be free from disease. May everybody have good luck. May none fall on evil days.

सर्व प्राणीमात्र सुखी होवोत. सर्व रोगमुक्त राहोत. सर्वांना सुंदर भविष्य दिसो. कुठेही कधीही दुःख नसो. सर्वत्र परम् शांति हो.

*सभी प्राणी सुखी बने. सभी रोगरहित हो. सभी सुंदर भवितव्य देखें. कहिभी कभिभी दुःख ना हो. सर्वत्र शांतिहि शांति हो.*

